**१४ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार कार्यरत न्यायालयाचे नुतनीकरण या योजनेंतर्गत मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांच्या अधिपत्याखालील अंधेरी येथील न्यायालयीन इमारतीची दुरुस्ती/ नुतनीकरणास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: चौविआ ०९१९/६४२/प्र.क्र.१६२/कार्या.११**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १० फेब्रुवारी, २०२०

<u>वाचा :</u> १. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र. B(W)६०४९/२०१०/७००, दि.३०/७/२०१९
२.मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांचे पत्र क्र.३९८६/२०१९, दि.१२/७/२०१९
३. शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्र.चौविआ १२१६/प्र.क्र.१०७/कार्या.९, दि.१०/११/२०१६.
४. शासन निर्णय, विधी व न्याय विभाग क्र.चौविआ १२१६/प्र.क्र.१०/नऊ,दि.१२/६/२०१७

<u>प्रस्तावना :</u>

१४ व्या केंद्रीय वित्त आयोगाने शिफारस केलेल्या "न्याय व्यवस्थेचे सक्षमीकरण" (Strengthening the Justice) या प्रयोजनासाठी सन २०१५-२०१६ ते २०१९-२०२० या ५ वर्षाच्या कालावधीकरीता महाराष्ट्र राज्यासाठी रुपये १०१४ कोटी इतक्या निधीची शिफारस केली आहे. १४ व्या वित्त आयोगांतर्गत कार्यरत न्यायालयाचे नविनीकरण या घटकासाठी ५ वर्षाच्या कालावधीकरीता रु.२२८ कोटी इतक्या निधीची तरतूद करण्यात आली आहे. १४ व्या वित्त आयोगाने केलेल्या शिफारशींची कार्यक्षम अंमलबजावणी करण्यासाठी दि.९/३/२०१६ रोजी उच्चस्तरीय संनियंत्रण समिती गठीत करण्यात आलेली आहे. सदर समितीच्या बैठकीमध्ये मा.उच्च न्यायालयाकडून प्राप्त झालेल्या कृती आराखड्यास तत्वत: मान्यता देण्यात आली आहे. तसेच वित्त विभागाच्या मान्यतेने संदर्भाधीन दि.१२/६/२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये १४ व्या वित्त आयोगांतर्गत न्यायालयीन इमारतीच्या दुरुस्तीच्या कामांना रुपये ५० लक्ष मर्यादेपर्यंत प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले आहेत.

मा.उच्च न्यायालयाच्या संदर्भीय अनुक्रमांक १ येथील पत्रान्वये मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांच्या अधिपत्याखालील अंधेरी येथील न्यायालयीन इमारतीची दुरुस्ती / नविनीकरणाचे अंदाजपत्रक प्राप्त झाले आहे. सदर अंदाजपत्रक सन २०१८-२०१९ च्या दरसूचीनुसार आहे. या प्रस्तावातील अंदाजपत्रक सहायक अभियंता, अंधेरी, विद्युत विभाग यांनी तयार केले असून संबंधित उप अभियंता, कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई व मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांनी साक्षांकित केले आहे. तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी सदर अंदाजपत्रक तपासून प्रशासकीय मान्यतेस विशेष बाब म्हणून सहमती दर्शविली आहे. त्यानुसार मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांच्या अधिपत्याखालील अंधेरी येथील कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

१४ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार कार्यरत न्यायालयाचे नुतनीकरण या योजनेअंतर्गत मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांच्या अधिपत्याखालील अंधेरी येथील न्यायालयीन इमारतीच्या दुरुस्ती /नुतनिकरणासाठी येणाऱ्या रु.५,०१,३६०/- (अक्षरी रुपये पाच लाख एक हजार तीनशे साठ फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास खालीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | मा.उच्च न्यायालयाच्या पत्राचा दिनांक | न्यायालयीन इमारत | कामाचे स्वरुप | अंदाजपत्रकीय किंमत | सा.बां.विभागाने परिगणित केलेली रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १ | ३०/७/२०१९ | अंधेरी | Providing renovation to Electrical Installation of 3rd floor of Andheri Court | ५,०१,३६० | ५,०१,३६० |
| | | | **एकूण** | | **५,०१,३६०** |

मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांच्या अधिपत्याखालील अंधेरी येथील न्यायालयीन इमारतीच्या दुरुस्ती/ नविनीकरणासाठी येणारा खर्च "मागणी क्र.जे-१, २०१४ न्यायदान १०२- उच्च न्यायालये, (११) कार्यरत न्यायालयाचे नविनीकरण, (११) (०१) कार्यरत न्यायालयाचे नविनीकरण (२०१४ ०५४८) या लेखाशीर्षाखालील मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर कामाची निविदा मागविण्यापूर्वी उपरोक्त कामे मा.उच्च न्यायालय, मुंबई यांच्या Dedicated Cell ने निश्चित केलेल्या कामामधीलच असल्याची खातरजमा करण्याची तसेच सदर अंदाजपत्रके सक्षम अधिकाऱ्याकडून साक्षांकित करण्याची जबाबदारी मुख्य महानगर दंडाधिकारी,मुंबई यांची राहील. प्रचलित कार्यपध्दतीचा अवलंब करुन ई-निविदा प्रक्रिया कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांच्याकडून राबविण्यात यावी व या प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने इतर अनुषंगिक कार्यवाही पूर्ण करावी.

हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौ.सं.क्र.२६/२०२०/इमा-२, दि.३/२/२०२० अन्वये तसेच शासन निर्णय, विधि व न्याय विभाग,क्र.चौविआ १२१६/प्र.क्र.१०/का.नऊ, दि.१२/६/२०१७ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००२१११२२२५३१११२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Navagire Santosh Sampatti

Digitally signed by Navagire Santosh Sampatti
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=214b4345a2842afe7dd0cbda9e8d83579cbedaaaef30f215ceda096e4e407797, serialNumber=0cb1b0de020015cf6d1f800579271f4816460b1802c2ae247dd6dd6f47462cd3, cn=Navagire Santosh Sampatti
Date: 2020.02.11 12:27:54 +05'30'

( सं.सं.नवगिरे )
कार्यासन अधिकारी

**प्रत,**

१) प्रबंधक (निरिक्षणे २), मा.उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,

२) मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई,
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई,
४) महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई,
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६) निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
७) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई,
८) सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई,
९) विधि व न्याय विभाग (का.९/२३), मंत्रालय, मुंबई,
१०) निवडनस्ती.